एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण, २०२३-२८. टेक्नीकल टेक्सटाईल पार्कची निवड व अर्थसहाय्य वितरीत करण्यासाठी मार्गदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**

**शासन निर्णय क्र. धोरण २०२४/प्र.क्र.०९/टेक्स-५**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक:- १६ जुलै, २०२४

**वाचा :-** (१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. धोरण-२०२३/प्र.क्र.८१/टेक्स-५, दि.०२ जून, २०२३.

(२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. धोरण-२०२३/प्र.क्र.८१-अ/टेक्स-५, दि.१२ डिसेंबर, २०२३ व दि. ०६ मार्च, २०२४.

**प्रस्तावना :-**

वेगाने बदलणाऱ्या जागतिक व्यावसायिक वातावरणात महाराष्ट्रातील वस्त्रोद्योगाला विकसित करुन नवीन आणि उदयोन्मुख संधी मिळवून देण्याची गरज आहे. हे ध्येय साध्य करून वस्त्रोद्योगाच्या वाढीस चालना देण्यासाठी पुढील ५ वर्षाच्या कालावधीसाठी संदर्भिय वाचा क्र.१ अन्वये एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण, २०२३-२८ जाहीर करण्यात आले आहे. उदयोन्मुख क्षेत्र म्हणून ओळखल्या जाणाऱ्या तांत्रिक वस्त्रोद्योग क्षेत्राचा वस्त्रोद्योग बाजारपेठेतील अंदाजे १३ टक्के वाटा असून देशाच्या सकल घरेलू उत्पादनामध्ये सरासरी ०.७ टक्के योगदान आहे. तांत्रिक वस्त्रोद्योग क्षेत्र इतर उद्योगाला सुध्दा मोठ्याप्रमाणावर हातभार लावत आहे. तांत्रिक वस्त्रोद्योग क्षेत्राचा जागतिक विकास दर २०२२-२०२८ या कालावधीमध्ये अंदाजे ४.७ टक्यांनी वाढणार आहे. देशात तांत्रिक वस्त्रोद्योग क्षेत्र विकासासाठी अनेक संधी असून या क्षेत्रात भारत सरकार विविध योजना, उदा. राष्ट्रीय तांत्रिक वस्त्रोद्योग अभियान तथा प्रोडक्शन लिंक्ड इन्सेन्टीव्ह (PLI) स्कीम राबवून अर्थव्यवस्थेला चालना देण्यासाठी तांत्रिक वस्त्रोद्योगावर मोठ्या प्रमाणावर भर देत आहे.

एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण, २०२३-२८ मध्ये राज्यात टेक्नीकल टेक्सटाईल पार्क स्थापन करण्याबाबत निर्णय घेण्यात आलेला आहे. टेक्नीकल टेक्सटाईल हे असे वस्त्रोद्योग घटक आहे ज्याचा मुख्य उद्देश हा केवळ तयार कापड निर्मिती नसून त्याच्या तांत्रिक व इतर वैशिष्टयामुळे औद्योगिक, संरक्षण, संशोधन, घरगुती व इतर उद्योगात वापर करण्यात येतो. या उत्पादनांची वैशिष्टे, कापडाचा अंतिम वापर, प्रक्रिया, इत्यादी बाबीनुसार त्याचे पुढीलप्रमाणे वर्गीकरण करण्यात येते.- बिल्डटेक Buildtech (Construction Textiles), ईन्डटेक Indutech (Industrial Textiles), पॅकटेक Packtech (Packaging textiles), अँग्रोटेक Agrotech (Agro-textiles), होमटेक Hometech (Domestic Textiles), इकोटेक Echotech (Environmentally friendly textiles), स्पोर्टटेक Sporttech (Sports textiles), क्लोथटेक Clothtech (Clothing Textiles), मेडीटेक Meditech/Medtex (Medical textiles), जीओटेक Geotech (Geo-textiles), मोबाईलटेक Mobiltech (Textiles used in transport), प्रोटेक Protech (Protective textiles), इ. तसेच केंद्र

शासनाच्या वस्त्रोद्योग मंत्रालयाकडून वेळोवेळी घोषीत केलेल्या उत्पादने याचा समावेश असून टेक्नीकल टेक्सटाईल मध्ये नवीन वस्त्रोद्योग घटकांना आकर्षित करण्यासाठी प्रोत्साहनपर सर्वतोपरी मदत करणे आवश्यक आहे. तसेच अलीकडच्या काळात तांत्रिक (टेक्नीकल टेक्सटाईल) वस्त्रोद्योगात जागतिक स्तरावर वाढ दिसून आली आहे. तांत्रिक प्रगती, अंतिम वापराच्या उपयोगामध्ये वाढ, खर्च, परिणामकारकता, टिकाऊपणा, वापरकर्ताशी-मैत्रीपूर्णता आणि तांत्रिक वस्त्रोद्योगाची पर्यावरण अनुकूलता यामूळे जागतिक बाजारपेठेत त्याची मागणी वाढलेली आहे. या बाबींचा विचार करुन राज्यात टेक्नीकल टेक्सटाईलच्या विकासावर भर देण्यासाठी एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण, २०२३ -२८ अंतर्गत राज्यातील प्रत्येक महसूली विभागात एक टेक्नीकल टेक्सटाईल पार्क उभारले जाणार आहे. सदर टेक्नीकल टेक्सटाईल पार्कची निवड व अर्थसहाय्य वितरीत करण्यासाठी मार्गदर्शक सूचना निर्गमीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमीत करण्यात येत आहेत.

**शासन निर्णयः-**

राज्यामध्ये प्रत्येक महसूली विभागात एमआयडीसी भागामध्ये एक टेक्नीकल टेक्सटाईल पार्क स्थापन करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत असून त्याबाबतची प्रक्रिया खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे:-

१. **पात्रता-** टेक्नीकल टेक्सटाईल पार्क म्हणून पात्र होण्यासाठी आणि प्रोत्साहने मिळविण्यासाठी टेक्नीकल टेक्सटाईल पार्कने खाली नमूद केलेले सर्व निकष पूर्ण केले पाहिजेत:-

**१.१** टेक्नीकल टेक्सटाईल पार्क म्हणून पात्र होण्यासाठी पार्कमध्ये किमान १० टेक्नीकल टेक्सटाईलचे युनिट्स स्थापित करणे आवश्यक राहील.

**१.२** टेक्नीकल टेक्सटाईल पार्क मध्ये स्थापित होणा-या युनिट्सपैकी कोणत्याही एका युनिटचे क्षेत्र पार्कच्या एकूण क्षेत्राच्या २५% पेक्षा जास्त नसावे. तसेच पार्कमध्ये कोणत्याही तीन प्रकारच्या टेक्नीकल टेक्सटाईलचे उत्पादन घेणे आवश्यक राहील.

**१.३** टेक्निकल टेक्सटाईल पार्क म्हणून पात्र ठरण्यासाठी किमान रू.४००.०० कोटीची स्थिर भांडवली गुंतवणूक (FCI) असणे आवश्यक आहे. स्थिर भांडवली गुंतवणूकीमध्ये (FCI ) जमीन आणि इमारतीच्या खर्चाचा समावेश केला जाणार नाही.

**१.४** टेक्निकल टेक्सटाईल पार्कमध्ये किमान ३० व्यक्तींची क्षमता असलेले कौशल्य विकास केंद्र स्थापन करणे आणि निरंतर प्रशिक्षणाची सोय असणे आवश्यक राहील. सदर केंद्र, पार्क स्थापित करणारे घटकांना स्वखर्चावर निरंतर चालू ठेवणे आवश्यक राहील. प्रशिक्षणाचे स्वरुप शासनाकडून यथावकाश अंतिम करुन कळविले जाईल.

**१.५ निवड प्रक्रिया-**

प्रत्येक महसूली विभागात टेक्निकल टेक्सटाईल पार्क स्थापन करण्यासाठी गुंतवणूकदारांना (Private Limited Company (ies), individually or in Partnership (Maximum ३ such companies)) आमंत्रित करण्यासाठी अभिरुचीची अभिव्यक्ती (Expression of Interest-EoI) मागविण्यात येईल. इच्छुक गुंतवणूकदार अभिरुचीची अभिव्यक्तीच्या (Expression of Interest-EoI) आवश्यकतेनुसार टेक्निकल टेक्सटाईल

पार्क स्थापनेचा हेतू आणि कागदपत्रे सादर करतील. भागीदारीच्या बाबतीत गुंतवणुकदारांमधील मुख्य भागिदार प्रस्ताव सादर करण्यास व त्यासंबधित कागदपत्रे सादर करण्यास जबाबदार असेल.

**१.६** अ.मु.स/प्र.स/सचिव (वस्त्रोद्योग) यांच्या अध्यक्षतेखालील पुढील समितीद्वारे गुंतवणुकदाराकडून प्राप्त झालेल्या अभिरुचीची अभिव्यक्ती (Expression of Interest-EoI) चे मूल्यमापन करण्यात येईल :-

| | |
|---|---|
| १. अ.मु.स/प्र.स/सचिव (वस्त्रोद्योग) | अध्यक्ष |
| २ अ.मु.स/प्र.स/सचिव (नियोजन) | सदस्य |
| ३. अ.मु.स/प्र.स/सचिव (वित्त) | सदस्य |
| ४ अ.मु.स/प्र.स/सचिव (उद्योग) | सदस्य |
| ५ वस्त्रोद्योग, आयुक्त, नागपूर | सदस्य |
| ६) The Indian Institute of Technology (IIT), मुंबई या संस्थेचे प्रतिनिधी | सदस्य |
| ७) Veermata Jijabai Technological Institute (VJTI), मुंबई या संस्थेचे प्रतिनिधी | सदस्य |
| ८) Indian Institute of Chemical (ICT), मुंबई या संस्थेचे प्रतिनिधी | सदस्य |
| ९) The Synthetic & Art Silk Mills' Research Association (SASMIRA) या संस्थेचे प्रतिनिधी | सदस्य |
| १०) Dattajirao Kadam Technical Education Society (DKTE) या संस्थेचे प्रतिनिधी. | सदस्य |
| ११) The Bombay Textile Research Association (BTRA) या संस्थेचे प्रतिनिधी | सदस्य |
| १२) सह/उप सचिव (टेक्स-५) | सदस्य सचिव |

**१.७**. एकाच महसूल विभागासाठी एकापेक्षा अधिक अर्जदार / गुंतवणूकदार असल्यास, अभिरुचीची अभिव्यक्ती (Expression of Interest-EoI) निवडण्यासाठी खालील निकषांच्या आधारे अर्जदाराचे मूल्यांकन केले जाईल :-

१. गुंतवणूकदारांच्या कंपनीचे निव्वळ संपत्तीमुल्य.

२. गुंतवणुकीचा आकार.

३. टेक्नीकल टेक्सटाईलच्या प्रकारांची संख्या (Technology types of sub-segments of technical textiles to be specified).

४. मागील अनुभव/ पुर्वानुभव.

५. कच्च्या मालाचे स्त्रोत.

६. उपलब्ध बाजारपेठ.

७. निर्यात अभिमुखता.

८. हरित तंत्रज्ञानासाठी नियोजन.

२. सदर अभिरुचीची अभिव्यक्ती (Expression of Interest-EoI) मध्ये पात्र ठरलेल्या गुंतवणुदारांना वस्त्रोद्योग विभागाकडे तपशीलवार प्रकल्प अहवाल (DPR) सादर करण्यास कळविण्यात येईल. गुंतवणूकदारांकडून प्राप्त होणा-या तपशीलवार प्रकल्प अहवालाचे (DPR) विश्लेषण अ.मु.स/प्र.स/सचिव (वस्त्रोद्योग) यांच्या अध्यक्षतेखालील उपरोक्त विभागीय समितीद्वारे केले जाईल. तपशीलवार प्रकल्प अहवालात (DPR) खालील गोष्टींचा समावेश असेल :-

| अ.क्र. | सामग्री | पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|
| १ | प्रकल्प परिचय | |
| २ | प्रवर्तक/कंपनी/भागीदार/संघटनेची माहिती | |
| २.१ | कंपनीबाबत संक्षिप्त माहिती | |
| २.२ | गुंतवणूकदाराबाबतची माहिती | |
| २.३ | व्यवस्थापन | |
| २.४ | भौगोलिक उपस्थिती | |
| ३ | प्रकल्प तपशील | |
| ३.१ | क्षेत्राचा आढावा/उद्योगाबद्दल माहिती | |
| ३.२ | प्रकल्पाची रूपरेषा आणि वैशिष्ट्ये - बाजार पेठेचा आकार, गुंतवणूक, रोजगार, विकासाचे चालक, ठिकाण | |
| ३.३ | प्रकल्पाची राज्याला असलेली आवश्यकता | |
| ४ | प्रकल्प आढावा | |
| ४.१ | प्रकल्पाचे उद्दिष्ट | |
| ४.२ | प्रकल्पाचा आराखडा | |
| ४.३ | प्रकल्प खर्चाची रचना - जमीन, इमारत, यंत्र व यंत्रसामग्री, हरित तंत्रज्ञान, प्रशिक्षण केंद्र, सामुहिक सुविधा, पाळणाघर सुविधा, वसतिगृह | |
| ४.४ | महसूल आणि खर्च गृहीतक | |
| ५ | प्रस्तावित प्रकल्पाचा महाराष्ट्राच्या विकासावर परिणाम | |
| ५.१ | आर्थिक प्रभाव | |
| ५.२ | सामाजिक विकास प्रभाव | |
| ५.३ | राज्याच्या सकल देशांतर्गत उत्पादनामध्ये (GDP) योगदान | |
| ५.४ | अंमलबजावणी वेळापत्रक | |
| ६ | शासनाकडून आवश्यक असलेली मदत आणि सादर करावयाची आवश्यक कागदपत्रे | |
| ६.१ | आर्थिक सहाय्य | |

(टिप- तपशीलवार प्रकल्प अहवालात (DPR) उपरोक्त गोष्टींचा समावेश असणे आवश्यक आहे परंतु ते उपरोक्त बाबींपुरतेच मर्यादित नसावे.)

विशाल प्रकल्पांसाठी (मेगा प्रोजेक्ट) (रु.४०० कोटी ते रु.१००० कोटी स्थिर भांडवली गुंतवणूक) तपशीलवार प्रकल्प अहवाल अ.मु.स/प्र.स/सचिव (वस्त्रोद्योग) यांच्या अध्यक्षतेखालील समितीद्वारे मंजूर केला जाईल. अति विशाल प्रकल्पांसाठी (अल्ट्रा मेगा प्रोजेक्ट्स) (रु.१००० कोटी पेक्षा जास्त स्थिर भांडवली गुंतवणूक) तपशिलवार प्रकल्प अहवाल मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीद्वारे मंजूर केले जातील.

निवड झाल्यानंतर वस्त्रोद्योग विभाग टेक्नीकल टेक्सटाईल पार्क उभारण्यासाठी संबंधीत अर्जदाराला हेतू-पत्र (Letter of Intent) निर्गमीत करेल.

३. **देय प्रोत्साहने**- टेक्नीकल टेक्सटाईल पार्कला खालीलप्रमाणे विविध प्रोत्साहने देय्य राहतील:-

| अ.क्र. | देय प्रोत्साहने | अनुदानाची रक्कम |
|---|---|---|
| १ | स्थिर भांडवली गुंतवणुकीवर भांडवली अनुदान | रू.४०० कोटी पेक्षा जास्त परंतु रू.१००० कोटी पेक्षा कमी स्थिर भांडवली गुंतवणूक (FCI) असलेल्या टेक्नीकल टेक्सटाईल पार्कला ५५% किंवा रू.२५० कोटी यापैकी जे कमी असेल ते भांडवली अनुदान मिळण्यास पात्र असेल.<br>रु.१००० कोटीपेक्षा जास्त स्थिर भांडवली गुंतवणूक (FCI) असलेल्या टेक्नीकल टेक्सटाईल पार्कला मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीमार्फत विशेष प्रोत्साहन पॅकेज (SPECIAL PACKAGE OF INCENTIVES) प्रदान केले जाईल.(जे प्रकल्प १००% महिलांद्वारे चालविले जातात अशा प्रकल्पांसाठी अतिरिक्त १०% अनुदान प्रदान केले जाईल. सदर अतिरिक्त भांडवली अनुदानालाही वरीलप्रमाणे जास्तीत जास्त अनुदानाची अट लागू राहील.) |
| २ | एफ्लुएंट ट्रीटमेंट प्लांट्स (ETP) आणि कॉमन एफ्लुएंट ट्रीटमेंट प्लांट्स (CETP) साठी अर्थसहाय्य | सदर प्रक्रिया केंद्राच्या उभारणीसाठी ५० टक्के भांडवली अनुदान किंवा ५ कोटी रुपयांपैकी जे कमी असेल तेवढे अर्थसहाय्य देण्यात येईल. |
| ३ | झिरो लिक्विड डिस्चार्ज (ZLD) साठी अर्थसहाय्य | झेडएलडी प्रकल्पांच्या स्थापनेसाठी पात्र बांधकाम (Civil Infrastructure) आणि यंत्रसामुग्रीच्या किमतीच्या ५०% (जास्तीत जास्त १० कोटी रुपयांपर्यंत) अनुदान देण्यात येईल. प्रकल्पाच्या एकूण खर्चात जमिनीच्या किंमतीचा समावेश असणार नाही. |

| | | |
|---|---|---|
| ४ | वीज अनुदान व सौर ऊर्जाबाबत | वीज अनुदान व सौर ऊर्जाबाबत एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण, २०२३-२८ मधील तरतुदी लागू राहतील. |
| ५ | सामायिक सुविधा केंद्रे | प्रस्तावीत पार्कसाठी एमआयडीसी कडून प्रचलीत नियमानुसार जमीन उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच एमआयडीसी कडून पायाभूत सुविधांचा विकास करण्यात येईल. |
| ६ | उद्योग विभागाकडील प्रोत्साहने | उद्योग विभागामार्फत अनुज्ञेय असलेली सर्व प्रोत्साहने उद्योग विभागामार्फत मिळण्यास पात्र असतील. |

४. **भांडवली अनुदान वितरणाचे निकष -**

शासनाने मान्यता दिलेल्या टेक्नीकल टेक्सटाईल पार्कच्या प्रवर्तकाने भांडवली अनुदान मंजूरीसाठी वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर कार्यालयाकडे ऑनलाईन अर्ज सादर करावेत. सदर शासन मान्य पार्कला खालीलप्रमाणे तीन हप्त्यांमध्ये भांडवली अनुदान दिले जाईल :-

(१) **पहिला हप्ता**- प्रस्तावित टेक्नीकल टेक्सटाईल पार्कचे ३०% काम पूर्ण झाल्यावर तसेच पार्कमधील एकूण घटकापैकी एक तृतीयांश घटक कार्यान्वित झाल्यानंतर देय्य भांडवली अनुदानाच्या ३०% इतका पहिला हप्ता वितरित केला जाईल (स्थिर भांडवली गुंतवणूकीच्या (FCI) ५५% किंवा रू.२५० कोटी यापैकी जे कमी असेल त्या रकमेच्या ३०%). सदर रक्कम कार्यरत घटकाच्या स्थिर भांडवली गुंतवणूकीपेक्षा जास्त असणार नाही. भागिदारीच्या (Partnership) बाबतीत, पार्कला एक संयुक्त खाते उघडावे लागेल ज्यामध्ये सदर रक्कम हस्तांतरित केली जाईल.

(२) **दुसरा हप्ता**- प्रस्तावित टेक्नीकल टेक्सटाईल पार्कचे काम पूर्ण झाल्यावर तसेच पार्कमधील सर्व घटक कार्यान्वित झाल्यानंतर देय भांडवली अनुदानाच्या ४०% इतका दुसरा हप्ता वितरित केला जाईल (स्थिर भांडवली गुंतवणूकीच्या (FCI) ५५% किंवा रू.२५० कोटी यापैकी जे कमी असेल त्या रकमेच्या ४०%).

(३) **तिसरा हप्ता** - प्रकल्प कार्यान्वित होऊन सलग १ वर्ष संपूर्ण युनिट यशस्वीपणे चालू असल्यावर उर्वरीत देय भांडवली अनुदानाच्या ३०% अनुदानाचा तिसरा हप्ता दिला जाईल. (स्थिर भांडवली गुंतवणूकीच्या (FCI) ५५% किंवा रू. २५० कोटी यापैकी जे कमी असेल त्या रकमेच्या ३०%).

५. वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर कार्यालयाकडून पडताळणी होऊन ऑनलाईन शासनास प्राप्त झालेल्या प्रस्तावास खालील समिती भांडवली अनुदान मंजूर करेल. सदर समितीमध्ये खालील अधिकाऱ्यांचा समावेश असेल :-

| | |
|---|---|
| १) अ.मु.स/प्र.स/सचिव (वस्त्रोद्योग) | अध्यक्ष |
| २) अ.मु.स/प्र.स/सचिव (नियोजन) | सदस्य |

| | |
|---|---|
| ३) अ.मु.स/प्र.स/सचिव (वित्त) | सदस्य |
| ४) अ.मु.स/प्र.स/सचिव (ऊर्जा) | सदस्य |
| ५) आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर | सदस्य |
| ६) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई | सदस्य |
| ७) सह/उप सचिव (टेक्स-५) | सदस्य सचिव |

सदर समितीची बैठक प्रत्येक महिन्याला किंवा आवश्यकतेनुसार आयोजित करून भांडवली अनुदानासाठी शासनास प्राप्त झालेल्या प्रस्तावांवर समिती योग्य तो निर्णय घेईल. समितीच्या निर्णयानुसार वस्त्रोद्योग विभाग अनुदान वितरणाचे आदेश निर्गमित करेल.

६. टेक्नीकल टेक्सटाईल पार्कला भांडवली अनुदान देण्यासाठी निधीची अर्थसंकल्पीय तरतूद खालील नमुद केलेल्या लेखाशिर्षाखाली करून त्यातून सदर योजनेवरील खर्च भागविण्यात येईल.

मागणी क्रमांक व्ही-२
२८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग,
(११०), संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था,
(०३) एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८,
(०३)(०६) एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ अंतर्गत भांडवली अनुदान योजना २०२३-२८,
(२८५१ ७४५४) ३३, अर्थसहाय्य.

७. हा शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या सहमतीने निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०७१६१२३०५५५८०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

SHRIKRISHNA BABURAO PAWAR

Digitally signed by SHRIKRISHNA BABURAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=631cf5e4544a7032340c686106b15138df3ef3b889e86fb2026c1add12d27e41, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2FAFF40BB05D156355556F7264A3A59AD12DD42F183422309976C41CE28C0A1D, cn=SHRIKRISHNA BABURAO PAWAR
Date: 2024.07.16 12:43:45 +05'30'

**( श्रीकृष्ण पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन,मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (गृह, विधी व न्याय) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

६. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.

७. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.

८. सर्व मा.संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य.

९. सर्व मा. वि.प.स./मा. वि.स.स., महाराष्ट्र राज्य.

१०. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

११. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.

१२. सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.

१४. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.

१५. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर.

१६. संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, नागपूर.

१७. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई.

१८. सर्व समिती सदस्य.

१९. वस्त्रोद्योग विभागातील सर्व कार्यासने.

२०. निवडनस्ती (कार्यासन टेक्स-५).